Sustainable Alternative Towards Affordable Transportation (SATAT) **योजनेचे प्रवर्तन करण्याकरीता “राज्य स्तरीय समन्वय समितीची” स्थापना करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपाऊ-२०२१/प्र.क्र.२०७/ऊर्जा-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: २४ मार्च, २०२३.

**संदर्भ :**

१. पेट्रोलिअम व नैसर्गिक वायू मंत्रालय, भारत सरकार यांचे दिनांक ११.०८.२०२० रोजीचे आदेश.
२. पेट्रोलिअम व नैसर्गिक वायू मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.F.NO.L-16023/5/2020-GP-I (E-37950), दिनांक २२.१०.२०२१.
३. इंडियन ऑईल कॉर्पोरेशन लिमिटेड यांचे पत्र क्र. IOC/CO/AE&SD/SATAT/MH/2, दिनांक २१.०१.२०२२.
४. मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दिनांक १३.१२.२०२२ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना:-**

ऊर्जा सुरक्षितता प्राप्त करणे तसेच आयातीवरील अवलंबित्व कमी करणे हे केंद्र शासनाचे धोरण आहे. यानुसार केंद्र शासनाकडून विविध नवीन व नवीकरणीय ऊर्जा स्त्रोतांना प्रोत्साहन देण्यात येत आहे. त्यापैकी, कॉम्प्रेस्ड बायोगॅस (Compressed Biogas) हे शून्य कार्बन उत्सर्जन करणारे स्वच्छ व पर्यावरणपूरक इंधन आहे. केंद्र शासनाने Compressed Biogas (CBG) चे उत्पादन व विपणन वाढविण्याकरीता “आत्मनिर्भर भारत अभियान” अंतर्गत दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१८ रोजी “Sustainable Alternative Towards Affordable Transportation” (SATAT) योजना सुरू केली आहे. या योजनेतंर्गत विनॉक्सी विघटन (anaerobic decomposition) पध्दतीद्वारे बायोमास घटक उदा. कृषीजन्य अवशेष, ऊसाची मळी, गुरांचे शेण व शहरी घन कचरा इत्यादी घटकांपासून Compressed Bio Gas (CBG) निर्मितीला प्रोत्साहन देण्यात येत आहे. सन २०२४ पर्यंत १५ MMTPA CBG आणि ५० MMTPA किण्वन केलेली जैविक खते (Fermented Organic Manure) उत्पादित व विपणित करण्यासाठी ५००० प्रकल्प आस्थापित करण्याचे या योजनेचे उद्दिष्ट आहे. राज्यामध्ये सदर योजनेची यशस्वी अंमलबजावणी व संनियंत्रण होण्यासाठी राज्यातील विविध विभागांचे सहाय्य तसेच त्यांच्यातंर्गत समन्वय राहण्यासाठी “राज्य स्तरीय समन्वय समिती” (State Level Coordination Committee) स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राज्यामध्ये “Sustainable Alternative Towards Affordable Transportation” (SATAT) योजनेची यशस्वी अंमलबजावणी व संनियंत्रण होण्यासाठी राज्यातील विविध विभागांचे सहाय्य तसेच त्यांच्यातंर्गत समन्वय राहण्यासाठी खालीलप्रमाणे “राज्य स्तरीय समन्वय समिती” (State Level Coordination Committee) स्थापन करण्यात येत आहे:-

<u>समितीची रचना:-</u>

| | | |
|---|---|---|
| १. | मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, | अध्यक्ष |
| २. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, उ, ऊ व का.विभाग (ऊर्जा) | सदस्य |
| ३. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, महसूल व वन विभाग (महसूल) | सदस्य |
| ४. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, नगरविकास विभाग | सदस्य |
| ५. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, ग्रामविकास विभाग | सदस्य |
| ६. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, कृषी व पदुम विभाग (कृषी) | सदस्य |
| ७. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, (उद्योग), उद्योग विभाग | सदस्य |
| ८. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, गृह विभाग (परिवहन), | सदस्य |
| ९. | सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग | सदस्य |
| १०. | आर.सी.एफ.चेंबुरचे प्रतिनिधी नामनिर्देशित संबंधित क्षेत्रातील तज्ञ व्यक्ती | सदस्य |
| ११. | महाव्यवस्थापक, इंडियन ऑईल कार्पोरेशन लि. मुंबई यांचे प्रतिनिधी- नामनिर्देशित संबंधित क्षेत्रातील तज्ञ व्यक्ती | सदस्य |
| १२. | महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे | सदस्य सचिव |

<u>समितीची कार्ये खालीलप्रमाणे राहतील:-</u>

१) प्रकल्प स्थळ निश्चिती, कच्च्या मालाची उपलब्धता, CBG उत्पादन क्षमता आणि off take योजना विचारात घेऊन SATAT योजनेसाठी राज्यस्तरीय कृती आराखडा तयार करुन घेणे व त्यास मान्यता देणे.

२) Compressed Bio Gas (CBG) प्रकल्पांची स्थापना व त्यासंबंधित कृतींकरीता राज्य स्तरीय इकोसिस्टिम तयार करणे.

३) SATAT योजनेच्या विविध घटकांमध्ये (Stakeholder) समन्वय साधणे.

४) CBG प्रकल्प स्थापन करण्यासाठी त्वरीत मंजूरी मिळण्याकरीता एक खिडकी मंजूरी (Single Window Clearance) कार्यपध्दतीची अंमलबजावणी करणे.

५) CBG प्रकल्पांचे समन्वय व सहाय्याकरीता वित्तीय बाबींची उपलब्धता सुनिश्चितता करणे.

६) तांत्रिक मानके, प्रकल्प खर्च निश्चित करणे आणि तांत्रिक पुरवठादार/संस्था यांचे पॅनेल तयार करणे.

७) CBG च्या मार्केटिंगसाठी CGD (City Gas Distribution) संस्थांसमवेत समन्वय साधणे.

८) CBG प्रकल्पांसाठी बायोमास / सेंद्रिय कचऱ्याचा शाश्वत पुरवठा सुनिश्चित करण्यासाठी बायोमास / सेंद्रिय कचरा पुरवठा साखळी (chain) स्थापन करण्यासाठी सक्षम यंत्रणा निर्माण करणे.

९) Fermented Organic Manure (FOM) आणि Liquid FOM च्या विपणनाकरीता इकोसिस्टिम तयार करणे.

१०) CBG प्रकल्पांसंबंधित समस्यांकरिता भागधारकांना (Stakeholder) प्लॅटफॉर्म उपलब्ध करून देणे.

११) CBG प्रकल्पांसाठी वित्तीय प्रोत्साहन व योजना प्रस्तावित करणे.

१२) सदर समितीची वेळोवेळी आवश्यकतेनुसार बैठक आयोजित करण्यात यावी.

**२.** सदर समितीने बैठक घेतल्यानंतर केलेल्या कार्यवाहीच्या प्रगतीचा अहवाल समितीच्या सदस्य सचिव यांनी शासनास सादर करावा.

३. सदर समितीमधील नामनिर्देशित केलेल्या सदस्यांना मानधन, प्रवासभत्ता इ. देय असणार नाही.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२७१२०८२७३८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NANASAHEB RAJARAM DHANE

Digitally signed by NANASAHEB RAJARAM DHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a71698611123263cde9d32423e9bb73044d91ed0cffad3b6267198ee5014159f, pseudonym=5DD23ACB82750B55FAC0D076A47198885E07A4B6, serialNumber=6C39E2858150DBDFCFE6CD25ED08ADF59F4D2FD8C1EDE1730735F604904BF3BB, cn=NANASAHEB RAJARAM DHANE
Date: 2023.03.27 17:25:59 +05'30'

**( ना. रा. ढाणे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व मंत्री/सर्व राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधान भवन, मुंबई.
६. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२
८. प्रधान सचिव (ऊर्जा) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांचे स्वीय सहायक, सर्व मंत्रालयीन विभाग,
१०. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, महसूल व वन विभाग (महसूल), मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, कृषी व पदुम विभाग (कृषी), मंत्रालय, मुंबई.
१४. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, उ. ऊ. व का. विभाग (उद्योग), मंत्रालय, मुंबई.
१५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, गृह विभाग (परिवहन), मंत्रालय, मुंबई.
१६. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. महाव्यवस्थापक, आर.सी.एफ. चेंबुर, मुंबई
१८. महाव्यवस्थापक, इंडियन ऑईल कार्पोरेशन लि. मुंबई
१९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई.
२०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२१. सचिव, महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग, मुंबई (पत्राने).
२२. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्या., मुंबई.
२३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्या.,मुंबई,
२४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्या.,मुंबई,
२५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कंपनी मर्या.,मुंबई,
२६. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे,
२७. उप सचिव/ऊर्जा-७, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२८. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, ऊर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२९. निवड नस्ती,ऊर्जा-७, उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.